ग्रामन्यायालय वैभववाडी, जिल्हा सिंधुदूर्ग या ग्रामन्यायालयासाठी कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः डीडीओ २०२२/प्र.क्र.९२/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १२ मे, २०२२

**वाचा-**

१ शासन अधिसूचना विधि व न्याय क्रमांकः सीआरसी २०१४/प्र.क्र.१०/का.बारा, दिनांक २४ जानेवारी, २०१४

२ शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक सीआरसी २००९/प्र.क्र.३७/का.१२, दिनांक १३ फेब्रुवारी, २०१२

३ प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W)A-१९०९ of २००९/ १०३४/१५९३८, दिनांक ०७ मे, २०२२

**प्रस्तावना-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दिनांक २४ जानेवारी, २०१४ रोजीच्या शासन अधिसुचनेअन्वये सिंधुदूर्ग जिल्ह्यातील वैभववाडी येथे ग्राम न्यायालय स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. २ येथे नमूद दिनांक १३ फेब्रुवारी, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात स्थापन करण्यात येणा-या एकूण २५ ग्राम न्यायालयांसाठी पद निर्मिती करण्यात आली आहे. जिल्हा न्यायालय सिंधुदूर्ग यांनी वैभववाडी ग्राम न्यायालयासाठी न्यायाधिकारी, ग्राम न्यायालय वैभववाडी (दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी कणकवली) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची विनंती मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेमार्फत केली आहे. त्या अनुषंगाने न्यायाधिकारी ग्राम न्यायालय वैभववाडी, जिल्हा सिंधुदूर्ग यांना सिंधुदूर्ग येथील ग्राम न्यायालय वैभववाडी या ग्राम न्यायालयासाठी ग्राम न्यायालय योजनेचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

वैभववाडी, जिल्हा सिंधुदूर्ग येथे ग्राम न्यायालय कायदा २००८ अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या ग्रामन्यायालयासाठी महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम क्रमांक १५(३) व १५६ अन्वये न्यायाधिकारी, ग्राम न्यायालय वैभववाडी, जिल्हा सिंधुदूर्ग यांना "कार्यालय प्रमुख" तसेच, “आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तिय बाबींपुरतेच मर्यादीत राहतील.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग एक, अनुक्रमांक तीन येथे नमूद नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यास आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे..

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१२१२०६०३०९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2022.05.12 12:08:37 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरीक्षणे-१/२), उच्च न्यायालय अपील शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय सिंधुदुर्ग,
३. न्यायाधिकारी ग्राम न्यायालय वैभववाडी (जिल्हा सिंधुदूर्ग) / दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी , कणकवली, जिल्हा सिंधुदूर्ग
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी सिंधुदूर्ग,
६. उप कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग
७. कक्ष अधिकारी (व्यय-५ / आ.पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कक्ष अधिकारी का.७/२३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती (का.१२).